सार्वजनिक आरोग्य विभागातील आरोग्य सेवा संचालनालयातील महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ व राज्य कामगार विमा योजनेतील महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ मधील वैद्यकीय अधिकाऱ्यांचे सेवानिवृत्तीचे वय ५८ वरुन ६० वर्षापर्यंत वाढविणेबाबत....

**महाराष्ट्र शासन**
सार्वजनिक आरोग्य विभाग
शासन निर्णय क्रमांकः सेवानि-१५१८/प्र.क्र.१६८/सेवा-२
गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत, १० वा मजला
मंत्रालय, मुंबई-४०० ००१
दिनांक: २९ ऑगस्ट, २०१८

**वाचा :-**

१) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्रमांकः सेवानि-१८१५/प्र.क्र.२१६/सेवा-२, दि. ०३.०९.२०१५
२) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन पत्र क्र. सेवानि-१५१८/प्र.क्र.१६८/सेवा-२, दि. ३१.०५.२०१८
३) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन पत्र क्र. सेवानि-१५१८/प्र.क्र.१६८/सेवा-२, दि. ३०.०६.२०१८
४) मंत्रीमंडळाचे सचिव यांचे दि. ३१.०७.२०१८ चे पृष्ठाकन
(मंत्रीमंडळ बैठक दि. १९.०७.२०१८ विषय क्रमांक ९ कार्यवृत्त)

**प्रस्तावना :-**

राज्याच्या सार्वजनिक आरोग्य विभागाकडून सामान्य रुग्णालये, उपजिल्हा रुग्णालये, ग्रामीण रुग्णालये राज्य कामगार विमा रुग्णालये यामधून रुग्णांना आरोग्य सुविधा पुरविण्यात येतात. तथापि, सदर रुग्णालयातील वैद्यकीय अधिकारी व वरीष्ठ अधिकाऱ्यांच्या कमतरतेमुळे रुग्णाना वेळेत योग्य आरोग्य सुविधा पुरविण्यात अडचणी निर्माण होत आहेत. वैद्यकीय अधिकारी तसेच विशेषज्ञ पदासाठी प्रयत्न करुन देखील पुरेशा प्रमाणात वैद्यकीय अधिकारी उपलब्ध होत नाहीत वा उपलब्ध झाल्यासही पसंतीच्या ठिकाणी पदस्थापना न मिळाल्यास सेवेत रुजू न होण्याचे प्रमाण मोठे आहे. परिणामी आरोग्य सेवेतील पदे मोठ्या प्रमाणात रिक्त राहत असून त्याचा राज्यातील रुग्णसेवेवर विपरित परिणाम होत आहे. ही बाब विचारात घेऊन दिनांक ०३.०९.२०१५ च्या शासन निर्णयान्वये राज्यातील आरोग्य सेवा संचालनालयातील महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ व राज्य कामगार विमा योजनेतील महाराष्ट्र वैद्यकीय विमा सेवा, गट-अ मधील वैद्यकीय अधिकारी व (वेतनबँड रु. १५६००-३९१०० ग्रेड पे रु. ५४०० व त्यावरील सर्व ) कार्यरत अधिकाऱ्यांचे सेवानिवृत्तीचे वय ५८ वरुन ६० वर्षापर्यंत वाढविण्याचा निर्णय शासनाने घेतला होता. तसेच सदर निर्णय हा दि. ३१.५.२०१५ पासून पूर्वलक्षी प्रभावाने तीन वर्षासाठी लागू करण्यात आला होता. तथापि, आरोग्य सेवा संचालनालयातर्गत महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ व राज्य कामगार विमा योजनेतील महाराष्ट्र वैद्यकीय विमा सेवा, गट-अ मधील अधिकारी मोठया प्रमाणात सेवानिवृत्त होत असल्याने त्याचा वैद्यकीय सेवेवर परिणाम होऊ नये म्हणून दि. ३१.०५.२०१८, दि. ३०.०६.२०१८ व दि.३१.७.२०१८ रोजी आरोग्य सेवा संचालनालयातर्गत महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ व राज्य कामगार विमा योजनेतील महाराष्ट्र वैद्यकीय विमा सेवा, गट-अ मधील अधिकाऱ्यांनी जरी वयाची ५८ वर्ष पूर्ण केली असली तरी ज्यांचे वय ६० वर्षापेक्षा कमी आहे अशा अधिकाऱ्यांना सेवानिवृत्त न करता त्यांच्याबाबतीत मंत्रीमंडळासमोर सेवानिवृत्तीचे वय वाढीचा प्रस्ताव सादर करण्याच्या अटीच्या अधीन राहून त्यांच्या वयाची ६० वर्षे पूर्ण होईपर्यंत शासन सेवेत ठेवण्याबाबत निर्णय घेण्यात आला आहे. ही बाब विचारात घेऊन आरोग्य सेवा

संचालनालयातील महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ मधील वैद्यकीय अधिकाऱ्यांचे तसेच राज्य कामगार विमा योजनेमधील गट-अ मधील वैद्यकीय अधिकाऱ्यांचे सेवानिवृत्तीचे वय ५८ वरुन ६० वर्षापर्यंत वाढविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सार्वजनिक आरोग्य विभागातील आरोग्य सेवा संचालनालयातील महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ मधील वैद्यकीय अधिकारी (वेतनबँड रु. १५६००-३९१०० ग्रेड पे रु. ५४००) व जिल्हा शल्यचिकित्सक, जिल्हा आरोग्य अधिकारी व विशेषज्ञ संवर्ग (वेतनबँड रु. १५६००-३९१०० ग्रेड पे रु. ६६००) मधील पदे व वरिष्ठ पदे (वेतनबँड रु. १५६००-३९१०० ग्रेड पे रु. ६६०० वरील) व राज्य कामगार विमा योजनेतील महाराष्ट्र वैद्यकीय विमा सेवा, गट-अ (वेतनबँड रु. १५६००-३९१०० ग्रेड पे रु. ५४०० व त्यावरील सर्व) वैद्यकीय अधिकाऱ्यांचे सेवानिवृत्तीचे वय ५८ वर्षावरुन ६० वर्षापर्यंत वाढविण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. सदर निर्णय दि. ३१.५.२०१८ पासून पूर्वलक्षी प्रभावाने पाच वर्षासाठी (दि. ३१.५.२०२३ पर्यंत) लागू राहील. मात्र वेतनबॅड रु. १५६००-३९१०० ग्रेड वेतन रु. ५४०० व त्याहून अधिक ग्रेड वेतन घेणाऱ्या आरोग्य सेवा संचालनालय व राज्य कामगार विमा योजनेतील वैद्यकीय अधिकारी (गट-अ) व वरिष्ठ पदावरील अधिकारी वगळता अन्य अधिकाऱ्यांना हा शासन निर्णय लागू राहणार नाही.

३. महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ मधील नियम १० मध्ये यथावकाश सुधारणा करण्यात येईल.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १८०/१८/सेवा-४, दि. २७.०८.२०१८ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८२८१३१०४३५८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vishnudas Pundlikrao Ghodke

Digitally signed by Vishnudas Pundlikrao Ghodke
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=514c2e5ad6ac71c69b99a86a5fe5189556b7a95d5896bbb81496f403bb58ac3e, cn=Vishnudas Pundlikrao Ghodke
Date: 2018.08.29 11:27:57 +05'30'

**( वि. पुं. घोडके )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मुख्य सचिव महाराष्ट्र राज्य
३. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

४. मा. मंत्री (आरोग्य/मा. राज्यमंत्री (आरोग्य) यांचे खाजगी सचिव

५. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई

६. आयुक्त, राज्य कामगार विमा योजना, मुंबई

७. मुख्य कार्यकारी अधिकारी, महात्मा फुले जीवनदायी आरोग्य योजना,मुंबई

८. प्रकल्प संचालक, महाराष्ट्र एड्स नियंत्रण सोसायटी मुंबई

९. जिल्हाधिकारी (सर्व)

१० मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)

११ संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई

१२ अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा (सर्व)

१३ सह संचालक, आरोग्य सेवा (सर्व)

१४ उपसंचालक, आरोग्य सेवा (सर्व)

१५ जिल्हा शल्यचिकित्सक (सर्व)

१६ जिल्हा आरोग्य अधिकारी (सर्व)

१७ महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर

१८ महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर

१९ अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई

२० जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)

२१ उपसचिव, सेवा-४, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई

२२ सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई

२३ प्रधान सचिव (सा.आ.) यांचे स्विय सहायक

२४ सहसचिव/उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई

२५ निवड नस्ती-सेवा-२